रत्नागिरी विशेष कारागृहाची दुरुस्ती व नुतनीकरण करण्याच्या खर्चास व अंदाजपत्रके-नकाशास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
गृह विभाग
शासन निर्णय क्र. बिएलजी २००४/प्र.क्र. १७/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-३२, दि. २५ मे, २००४

वाचा :- कारागृह उप महानिरिक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. बीएलजी / रविका / ६७१ / कक्ष-३, दि. २९.१.२००४.

शासन निर्णय :- रत्नागिरी विशेष कारागृहाचे बांधकाम सन १८५४ मध्ये झालेले असून ते फार जुनु झाले आहे. त्यास सुमारे १५० वर्षे पूर्ण झालेली असल्यामुळे त्याची नैसर्गिक आपत्तीमुळे सतत पडझड होते त्यामुळे वरचेवर किरकोळ दुरुस्ती करावी लागते. त्याशिवाय या बांधकामाची आयुष्यमर्यादा यापूर्वीच संपुष्टात आलेली असल्याने भविष्यात या कारागृहाची आयुष्यमर्यादा वाढविणे व कारागृहाची सुरक्षितता अबाधित ठेवण्याच्या दृष्टीने कारागृहाच्या मुख्य तटभिंतींची दुरुस्ती करणे, जुन्या पाण्याच्या पाईप लाईन्स बदलणे शासकीय निवासस्थानांची दुरुस्ती. तसेच कारागृह व बरॅकींच्या सर्व दरवाजांची दुरुस्ती करणे इत्यादी महत्वाची कामे करणे अत्यंत आवश्यक आहेत. त्यासाठी या सर्व बाबींचा समावेश करुन सदर दुरुस्तीसाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी यांनी स्वाक्षांकित केलेले रु. ३३,३१,७४३/- इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशे उक्त दि. २९.१.२००४ च्या पत्रान्वये कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे.

२. सदर खर्चाचा समावेश केंद्रपुरस्कृत कारागृह सुधारणा योजनेच्या सन २००३-२००४ च्या सुधारीत आराखड्यात केलेला आहे. उपरोक्त खर्चाच्या अंदाजपत्रकातील खर्चाची रक्कम रु. ३३,३१,७४३/- यामध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाने +५% सेंटेज चार्जेस धरुन रुपये ३३,५१,३६१/- (रुपये तेहेतीस लाख एकावन्न हजार सहाशे एकतीस फक्त) इतक्या खर्चास सहमती दर्शविली असून त्यास वित्त विभागानेही मान्यता दिली आहे.

३. उपरोक्त वस्तुस्थिती, कारागृहाची सुरक्षितता, कामाची निकड व त्यामुळे बंद्यांना होणारी सोयीसुविधेतील वाढ या बाबींचा विचार करुन रत्नागिरी विशेष कारागृहाची दुरुस्ती व नुतनीकरण करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीनुसार रुपये ३३,५१,६३१/- (तेहेतीस लाख एकावन्न हजार सहाशे एकतीस फक्त) इतक्या खर्चास व अंदाजपत्रके नकाशास शासन या आदेशाद्वारे प्रशासकीय मंजूरी देत आहे.

५. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. बी-५, मुख्य लेखाशीर्ष "२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (केंद्रपुरस्कृत) (योजनेतर) (२०५६-०९८९)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा मात्र निधी उपलब्ध झाल्यानंतरच विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार सदर बांधकामाचे काम सुरु करण्यात यावे व खर्चाची माहिती विहित विवरणपत्रात केंद्रशासनास पाठविण्यासाठी शासनास सादर करावी.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र. सीआर २०५/०४/व्यय-८, दि. ०९.०३.२००४ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(र. ना. माळी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत,

- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक, दक्षिण विभाग, ~~रत्नागिरी~~ मुंबई
- अधिक्षक, नांदेड जिल्हा कारागृह, नांदेड.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर.
- जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
- कार्यकारी अभियंता, रत्नागिरी (सा. बां.) विभाग, रत्नागिरी.
- उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र. १, रत्नागिरी.
- सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
- वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई-३२.
- अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती, पीआरएस-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.